"राज्यातील संवेदनशील वनक्षेत्रात वनसंरक्षणा करीता राज्य राखीव पोलीस दलाच्या तुकडया कायमस्वरुपी वन विभागाकडे ठेवणेया " योजनेतर योजनेखालील अस्थायी पदे सन २०१९-२०२० मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- टिआरएस-०३/२०१९/प्र.क्र.४४/फ-६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ ऑक्टोबर, २०१९

वाचा :-
१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/योजनेत्तर/प्र.क्र.४०/१८-१९/२०९३, दिनांक २२.२.२०१९.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.२.२०१९
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग समक्रमांक दिनांक १६.३.२०१९
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/यो/प्र.क्र.१/१६-१७/१०५८/१७-१८, दिनांक ३०.९.२०१९.
५) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.९.२०१९
६) शासन निर्णय एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८दिनांक १३.९.२०१९

**शासन निर्णय :-**

"राज्यातील संवेदनशील वनक्षेत्रात वनसंरक्षणाकरीता राज्य राखीव पोलीस दलाच्या तुकडया कायमस्वरुपी वन विभागाकडे ठेवणे" या योजनेतर योजनेमधील ३८ अस्थायी पदास दिनांक १.३.२०१९ ते दिनांक ३०.९.२०१९ पर्यत संदर्भिय क्र.३ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

या योजनेतर योजनेखालील ३८ अस्थायी पदांना पदांना संदर्भीय क्र.३ येथील दिनांक १६.३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०.९.२०१९ पर्यत चालू ठेवण्यास शासनाची मंजुरी देण्यात आली आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ अन्वये सदर पदे दिनांक १.१०.२०१९ ते दिनांक २९.२.२०२० पर्यत या कालावधीत पुढे चालू ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.५ येथे नमूद सूचनास अनुसरुन याद्वारे आता सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील ३८ अस्थायी पदांना दिनांक १.१०.२०१९ ते दिनांक २९.२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे. या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| **प्रधान शीर्ष** | - | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | - | ०१ वनीकरण |
| **गौण शीर्ष** | - | १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती |
| **उप गौण शीर्ष** | - | (०३) आग लागण्यापासून वनांचे सरंक्षण<br>(०३)(०१) आग लागण्यापासून वनांचे सरंक्षण<br>(२४०६ ०१३१) |

हा शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/वित्तीय सुधारणा-१, दिनांक १५.५.२००९ च्या जोडपत्रातील भाग पहिला उपविभाग-३ येथील अ.क्र.४ परिच्छेद २७ (२) (क) व शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ११.९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९१०१६१६०७४६४२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सोबत :- विवरणपत्र

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2019.10.16 16:10:17 +05'30'

**(सुजय दोडल)**
**सह सचिव (वने),**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर, ठाणे, धुळे.
५) महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल-१/२, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८) वित्त विभाग, व्यय-१०/ अर्थ-६, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९) वित्त विभाग, वित्तिय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) ब-१/फ-२/फ-४ कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) फ-६ कार्यासन, महसूल व वन विभाग (निवडनस्ती), मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय क्रमांक :- टिआएस- ०३/२०१९/प्र.क.४४/फ-६,**

**दिनांक १६ ऑक्टोबर, २०१९ सोबतचे विवरणपत्र "अ"**

खालील तक्त्यामध्ये नमूद करण्यात आलेली पदे शासन निर्णय गृह विभाग क्र.एम.एस. आय. (८९५/१३३६/प्र.क्र.६/पो.ल./३/दिनांक २६.६.१९९७ अन्वये निर्माण करण्यात आली आहेत.

| अ. क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सशस्त्र पोलीस उपनिरिक्षक | १ |
| २ | सशस्त्र पोलीस हवालदार | ६ |
| ३ | सशस्त्र पोलीस शिपाई | २४ |
| ४ | पोलीस शिपाई चालक | ३ |
| ५ | सहायक स्वयंपाकी (सहायक आचारी) | २ |
| ६ | भोजन सेवक | २ |
| | **एकूण** | **३८** |

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2019.10.16 16:10:33 +05'30'

**(सुजय दोडल)**
**सह सचिव (वने),**
**महसूल व वन विभाग**